नं. ३५

ॐ

रावबहादुर मल्लप्पा वसप्पा वारद सोलापूर ह्यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रन्थ ४२ वा.




निर्वाणमंत्रिराजविरचितक्रियासारसारसर्वस्वभूषणाख्यव्याख्यासमेतम्.

श्रीमन्नीलकंठशिवाचार्यप्रणीत

# क्रियासार

## ( परिच्छेदद्वयम् )

## क्रियासारग्रंथांतील १, ला २ रा परिच्छेद.

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं

सोलापूर येथें

" श्रीदत्तप्रसाद " छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

---

आवृत्ति १ ली, प्रति ५००.

---

शके १८३२, सन १९१०.

---

हा ग्रंथ प्रसिद्धकर्त्यानें सर्व हक्कांसह रावबहादुर मल्लप्पा बसप्पा वारद यांस अर्पण केला आहे.

---

किंमत रुपये १॥




# प्रस्तावना.

आत्मज्ञानविहीनानां शास्त्रसंदिग्धचेतसाम् ।
स्वस्वरूपाववोधाय मदीयो ह्येष उद्यमः ॥

वीरशैवमतप्रकाशनास केवल आधारस्तंभ असा हा क्रियासार नामक अप्रतिम प्रौढ ग्रंथ आह्मीं आमच्या धर्मबंधूंस व इतर वीरशैवमतजिज्ञासूंस मोठ्या आनंदानें अर्पण करीत आहों. ह्या परमपूज्य क्रियासारग्रन्थाचा कर्ता श्रीमन्नीलकंठाचार्य हा होय. हा अत्यंत शिवभक्त असून ह्यास साक्षात् शिवप्रसाद होऊन हा ग्रन्थ रचण्यास साक्षात् शिवानें आत्मदर्शन देऊन आज्ञा केली होती असें दिसतें. कारण उपोद्घात-प्रकरणीं ह्यानें आपल्याविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहेः—

देवः कैलासनाथः कलितशशिकलः शर्वरीपश्चिमांशे ।
कारुण्यांभोनिधिर्मामशिशिषदमलैः सूक्तिवृंदैरमंदैः ॥
सर्वेषामागमानां वचनसमुदयैः संगृहीतैः प्रबंधं ।
कुर्यास्त्वं वत्स बुद्धिः प्रसरति विमला ते क्रियासारनाम्ना* ॥

अर्थः—कैलासवासी, चंद्रमौली व कारुण्यसागर अशा श्रीउमावल्लभानें पाहाटेच्यावेळीं स्वप्नांत दर्शन देऊन अमृतसम अस्खलित वाणीनें अशी आज्ञा केली कीं, "बाळा, सर्व आगमांतून सारभूत वचनें घेऊन क्रियासार नामक ग्रन्थ-रचना कर. ही कृति करण्यास तुझी शुद्धबुद्धि विस्तृत होईल."

सारांश अशा प्रकारें ईश्वरानुग्रहानें व दर्शनानें शुद्ध व कृतकृत्य झालेल्या शिवभक्तानें कोणत्याकाळीं ह्या भूलोकीं अवतार घेऊन कोणत्या देशांतील कोणत्या स्थलाला अलंकृत व पवित्र केलें व कोणत्या परिस्थितींत इहलोकची संसार-यात्रा संपवून कोणत्या काळीं शिवैक्य संपादिलें इत्यादि विषयांच्या सविस्तर वृत्तांतानें प्रस्तुतकालच्या इतिहास-जिज्ञासूंचें किती तरी बरें समाधान झालें असतें? परंतु आह्मां भारतवासीजनांच्या दुर्दैवामुळेंच आमच्या बहुतेक सर्व प्राचीन ग्रन्थकारांनीं याविषयीं जणु काय मौनव्रत घेण्याचा कटच केला आहे असें दिसतें. नाहींतर ज्या श्रीनीलकंठाचार्यानें शिवाज्ञेवरून अनेक आगमादि ग्रन्थांचें अवलोकन करून प्रस्तुत क्रियासारासारखी सर्वांगसुंदर व विस्तृत ग्रन्थ-रचना केली त्यास जन्ममरणादिकालनिर्देशक आत्मवृत्त कथन करणें अशक्य होतें असें नाहीं. असो. सदरील आचार्यवर्यांनीं आपल्या उपोद्घातप्रसंगीं मोठ्या कोमलवाणीनें आदर व भक्तिरस ह्यांनीं ओथंबलेले असे आपल्या पितरांविषयीं जे उद्गार काढिले आहेत व पितृवंदन केलें आहे त्यांवरून ह्या परम शिवभक्त आचार्यांच्या ठिकाणीं आपल्या आईबापांविषयीं प्रेम व पूज्यबुद्धि केवढी होती याची वाचकांस सहज कल्पना करितां येईल. ते श्लोक पुढीलप्रमाणें होतः—

वंदे मल्लयदेवदेशिकवरं तातं शिवाराधने ।
बद्धोत्साहमनादिवीरविलसच्छैवागमोक्तक्रमैः ॥

---

* उपोद्घातप्रकरण श्लोक ६ पृ. १ पहा.

प्रातर्मध्यदिनेऽथसायमुचितै र्नालं दिवाशर्वरी ।
यत्स्वाभाविकभक्तियोगलहरी विस्तारणायाखिलम् ॥
तां वंदे चन्नमांवामहरहरुदितैर्भक्तिभावैरुदारैः ।
पातिव्रत्यं शिवार्चापरिचरणविधौ साधुसंपादयंतीम् ॥
मैत्रीमासादयंतीं परशिवपदयोः पश्यतां पावयित्रीं ।
धात्रीशीलानुकर्त्रीं परकृतसहने सादरं मत्सवित्रीम्* ॥

प्रस्तुत श्लोकांचा भावार्थः— अनादि व दिव्य वीरशैवागमांत सांगितल्याप्रमाणें शिवपूजन करण्यांत ज्याचा कधींही उत्साहभंग झाला नाहीं व ज्यास सकाळ, संध्याकाळ, दिवसा व रात्रीं शिवपूजन करीत असतांहि शिवचरणीं आपली स्वाभाविक भक्ति प्रदर्शित करण्यास अहोरात्र पुरत नसे त्या मल्लयदेव नामक माझ्या गुरुवर्य पित्याचें नमन करितों. तसेंच नित्यशः उदारभक्तिरसानें शिवपूजा प्रसंगीं परिचारक होऊन जी उत्तम भर्तृ-प्रेम संपादन करी व श्रीशिवचरणीं भक्तिभाव संपादन करीत असे; त्याचप्रमाणें जिच्या दर्शनानें जन शुद्ध होत असत व जी पृथ्वीप्रमाणें दुसऱ्यानें दिलेलें दुःख सहन करीत असे त्या माझ्या चन्नमांवा नामक जननीचें मी सन्मानपूर्वक वंदन करितों. ह्या वरील विवेचनावरून इतकें सिद्ध होतें कीं, प्रस्तुत आचार्यांच्या वडिलांस वीरशैवागमांचें चांगलें ज्ञान असून ते आगमोक्त आचार पाळण्यांत भक्तिमान् होते. त्याचप्रमाणें आचार्यांची मातुश्रीहि शिवचरणीं अत्यंत भक्तिमान् पतिव्रता व शुचिर्भूत असून परदुःख सहन करण्यास पृथ्वीप्रमाणें सहनशील व उदार होती असें दिसून येतें. असो. अशा प्रकारें अत्यंत शुचिर्भूत अतएव पूज्य अशा आई-बापांपासून ज्यांस जन्म लाभला ते श्रीनीलकंठाचार्य प्रस्तुत उपलब्ध असलेल्या सर्व वीरशैव ग्रन्थकारांमध्यें जसे सूर्याप्रमाणें भासत आहेत त्याचप्रमाणें ते आपल्या समकालीन लोकांस आपल्या अलौकिक गुणांनीं तेजस्वी भासले असावेत यांत सुतराम् शंका नाहीं.

ह्या श्रीनीलकंठशिवाचार्यांच्या ग्रन्थांतून स्वमतस्थ व परमतस्थ अनेक सन्माननीय ग्रन्थकारांनीं उतारे घेऊन आपली पूज्यबुद्धि व्यक्त केली आहे. ह्यास्तव अशा थोर ग्रन्थकाराचा कालनिर्णय होणें अत्यंत आवश्यक आहे. हा ग्रन्थकार बराच प्राचीन असावा असें वाटतें—परंतु प्रस्तुतकालीं अनुमानावांचून अन्य कोणत्याही प्रकारचा तत्प्राचीन कालनिर्णायक पुरावा आह्मांजवळ उपलब्ध नाहीं. एवढी गोष्ट खरी असावी कीं,— सुमारें ८०० वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या वीरशैवमतसुधारक श्रीबसवेश्वराच्या मागून झालेल्या बहुतेक सर्व वीरशैवग्रन्थकारांनीं आपल्या ग्रन्थांतून श्रीबसवेश्वराचा निदान नामनिर्देश केल्यावांचून तरी सोडिलें नाहीं. ह्यामुळें श्रीबसवेश्वरामागून झालेल्या वीरशैव ग्रन्थकारांचा तादृश कालनिर्णय करितां येतो. परंतु श्रीनीलकंठाचार्यांनीं प्रस्तुत उपलब्ध असलेल्या आपल्या क्रियासारग्रन्थांत श्रीबसवेश्वराचें नांव किंवा त्यांच्या मागून झालेल्या कोणत्याहि कवीचा अगर अन्य विभूतींचा केवल नामनिर्देशहि केला नाहीं. ह्यावरून श्रीनीलकंठाचा काल श्रीबसवेश्वरापलीकडचा असावा असें मानणें अयुक्तिक होणार नाहीं.

---

* उपोद्घातप्रकरण श्लोक ४।५ पहा.

प्रस्तुत क्रियासार ग्रन्थकाराच्या कालाविषयीं जीं निश्चित प्रमाणें उपलब्ध झालीं आहेत तीं अशीं कीं, ह्या ग्रन्थाच्या पहिल्या चार उपदेशांवर, † "दोड्डनगरसीमी" ह्या प्रांताच्या केळदी नामक शहरीं कांहीं वर्षांपूर्वी राज्य करणाऱ्या सोमशेखर नामक राजाच्या "निर्वाणमंत्रिराज" नामक प्रधानानें प्रस्तुत ग्रन्थाखालीं दिलेलें "क्रियासारसारसर्वस्वभूषण" नामक विस्तृत व्याख्यान केलें आहे. त्यांत प्रथम उपदेशाच्या व्याख्यानाच्या आरंभीं—

" मौनप्पसंख्यावदुदारभावमोदाय भूयाल्लिखितं मयेदम् "

अर्थः—ही माझी कृति मौनप्पा पंडिताच्या उदार अंतःकरणाला आनंददायक होवो." ह्यांत ज्याचा उल्लेख झाला आहे त्या मौनप्पा पंडितानें वीरशैवाचारकौस्तुभ नांवाचा विस्तृत ग्रन्थ केला आहे. ह्या मौनप्पा ग्रन्थकारानें आपल्या ग्रन्थाचा समाप्तिकाल पुढीलप्रमाणें दिला आहेः—

प्रख्याते वरशालिवाहनशके व्योमारिषड्वर्गषट्
चंद्राख्ये गणनायिते प्रगुणितेऽब्दे कालयुक्ताक्षके ॥
नैजेष्टाश्वयुजे प्रवृद्धतिथिके पक्षे तृतीयादिने
मौनप्पाभिधधीरनिर्मितपरग्रन्थोऽगमत्पूर्णताम् ॥

ह्यावरून ह्या वीरशैवाचारकौस्तुभ ग्रन्थास आज मित्तीस १७१ वर्षें झालीं आहेत असें स्पष्ट होत आहे कारितां क्रियासाराच्या पहिल्या चार उपदेशांवरील टीकाकारास १७१ वर्षें होऊन गेलीं असल्याचें स्पष्ट होतें. ह्यावरून मूल क्रियासारग्रन्थ १७१ वर्षांपूर्वी कांहीं वर्षें निर्माण झाला असल्याचें स्पष्ट होत आहे.

आतां हा क्रियासारग्रन्थ केवळ वीरशैवांसच मान्य आहे किंवा होता असें नाहीं. कारण परमतस्थ पंडितवर्य धर्मशास्त्रकारप्रवर कमलाकरभट्ट ह्यांनींही आपल्या "निर्णयसिंधु" नामक धर्मशास्त्रग्रंथांतहि पार्थिवपूजेच्या सदराखालीं पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहेः—

( क्रियासारेः- )

मध्यमानामिकामध्ये पुष्पं संगृह्य पूजयेत् ।
अंगुष्ठतर्जन्यग्राभ्यां निर्माल्यमपनोदयेत् ॥
अपनीतं च निर्माल्यं चंडेशाय निवेदयेत् ।
अशून्यमस्तकं लिंगं सदा कुर्वीत पूजकः ॥

ह्या कमलाकरभट्टाचा पुतण्या विद्वद्वर्य गागाभट्ट ह्यानें श्रीशिवाजीमहाराजांस राज्याभिषेक केल्याचें प्रसिद्ध आहे. व शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकास आज २३६ वर्षें झाल्याचें प्रसिद्ध आहे. ह्यावरून गागाभट्टाचा चुलता कमलाकरभट्ट ह्यानें रचिलेल्या " निर्णयसिंधु " नामक ग्रंथास निदान २७५ वर्षांहून अधिक काल लोटला असावा असें दिसतें व ह्या काशीस्थ पंडितकृत निर्णयसिंधुग्रन्थांत क्रियासाराचा उल्लेख येण्याची योग्यता येण्यासारखी प्रसिद्धि होण्यास क्रियासारग्रंथास तत्पूर्वी बरींच शतकें होऊन गेलीं असावींत ह्यांत संशय नाहीं.

---

† हा प्रांत सध्यां म्हैसूर संस्थानासमीप आहे.

त्याचप्रमाणें शारदातिलक व श्री पांचवा नेपाल महाराजाधिराज प्रतापसिंह शाह बहादूरवर्म-विरचित पुरश्चर्यार्णव इत्यादि परमत ग्रन्थांतहि प्रस्तुत क्रियासाराचे उतारे घेतलेले आढळतात. ह्याव-रून सुमारें दोनशांहून अधिक वर्षांपूर्वीं दक्षिण देशस्थ वीरशैवपंडिताच्या ग्रन्थाची काशी, नेपाळ-पर्यंत प्रसिद्धि होऊन ह्या दाक्षिणात्य कृतीस मान्यता प्राप्त होण्यास दोनशें वर्षांपूर्वीं वरींच शतकें लोटलीं असलीं पाहिजेत. ह्या पूर्वोक्त सर्व विवेचनावरून ह्या क्रियासारग्रन्थाची प्राचीनता व योग्यता वाचकांचे सहज लक्षांत येणार आहे.

अलीकडे गुब्बी मल्लण्णार्यकृत वीरशैवामृतमहापुराण नांवाचा कानडीभाषेंत लिहिलेला एक मोठा ग्रन्थ बेंगलूर येथील वे॥ शिवप्पाशास्त्री यांनीं अलीकडे सन १९०६ मध्यें बेंगलूर येथें छापून प्रसिद्ध केला आहे. ह्या पुराणाच्या ७ व्या कांडाच्या दुसऱ्या अध्यायाच्या २७ व्या पद्याच्यापुढें खालील उल्लेख केलेला आढळतोः—

क्रियासारे— अनेकजन्मशुद्धानां श्रौतस्मार्तानुवर्तिनाम् ॥

ह्याशिवाय आणखी कित्येक स्थलीं ह्या ग्रन्थांत क्रियासारांतून अवतरणें घेतल्याचें आढळतें परंतु विस्तारभयास्तव येथें एकाचाच स्थलनिर्देश केला आहे. सदरील पुराण शके १४५२ च्या आश्विन महि-न्याच्या शुद्ध ५ सोमवार रोजीं समाप्त झालें असें ग्रन्थकर्त्यानें सदरील पुराणाच्या ८ व्या कांडाच्या २२ व्या संधीच्या ५५ व्या पद्यांत लिहिलें आहे. सदरहू शकावरून पाहतां आजमित्तीस त्या पुरा-णाच्या समाप्तिकालास ३८० वर्षें झालीं आहेत. ह्यावरून पाहतां वीरशैवांस क्रियासारग्रन्थ मान्य होऊन बराच काल लोटला असावा. सबब सदरील ३८० वर्षांहून पूर्वीं क्रियासारग्रन्थ निर्माण होऊन वरींच शतकें लोटलीं असावींत हें स्पष्ट होतें. असो.

प्रस्तुत ग्रन्थकारानें "भाषाप्रबंध" नांवाचा दुसरा एक ग्रन्थ लिहिला असल्याचें क्रियासारग्र-न्थाच्या १९ व्या उपदेशाच्या अंतीं असलेल्या वचनावरून व्यक्त होत आहे. ‡

परंतु सांप्रत तो ग्रन्थ अगर दुसरे कांहीं ग्रन्थ ह्यांनीं लिहिले असल्यास ते कोणतेही ग्रन्थ हल्लीं आह्मांस मिळाले नसल्यामुळें ह्याविषयीं विशेष कांहीं लिहितां येत नाहीं.

सध्यां आह्मी छापून प्रसिद्ध करीत असलेल्या क्रियासारग्रन्थाचे ३२ उपदेश आहेत असें उपो-द्घातप्रकरणीं आचार्यांनीं केलेल्या पुढील उल्लेखावरून दिसतें— "द्वात्रिंशदुपदेशास्ते भवंति कथिता इमे*" परंतु सध्यां आमच्याजवळ असलेल्या ग्रन्थांत उपोद्घातप्रकरण सोडून ३१ उपदेश देऊन "समा-प्तोऽयं क्रियासारग्रन्थः" असा शेरा मारिलेला आढळतो. आतां ग्रन्थकारानें उपोद्घातप्रकरणाचा उप-देशांत समावेश करून "द्वात्रिंशदुपदेशास्ते भवन्ति कथिता इमे" असें सांगितलें असावें असें दिसत नाहीं. दुसरें असें कीं, उपोद्घातप्रकरणांत प्रत्येक उपदेशाची जी विषयसूची दिली आहे तीवरून पहातां * * * द्वात्रिंशदुपदेशके ॥ शिवमहात्म्यकथने श्रवणेभक्तिपूर्वकम् ॥ श्रेयःपरंपरावाप्तिः * * ह्याप्रमाणें

---

‡ तें असें— अध्वनामध्वपते श्रेष्ठस्याध्वनः पारमसीवेति मंत्रेण कृतकलासंनिधानस्य लिंगस्य दीक्षापूर्वकधारणमित्यागमप्रकारो भाषाप्रबंधेऽस्मत्कृतेऽवलोकनीयः

* उपोद्घातप्रकरण पृ. ४ श्लोक ३४ पहा.—

प्रबंधस्य क्रमादेवमुपोद्घातादनंतरम् । द्वात्रिंशदुपदेशास्ते भवन्ति कथिता इमे ॥ ३४ ॥

"बत्तीसाव्या उपदेशांतील शिवमाहात्म्यकथन व श्रवण ह्यांचें श्रेय" हा जो विषय तो आमच्याजवळ असलेल्या क्रियासाराच्या कानडीप्रतींत मुळींच उपलब्ध नाहीं. ह्यावरून मूलग्रन्थांत उपोद्घातप्रकरणाखेरीज ग्रन्थकाराच्या ह्मणण्याप्रमाणें ३२ उपदेश असावेत परंतु कानडी प्रत छापतांना प्रकाशकांनीं मिळाला तितकाच ग्रन्थ छापून ३१ व्या उपदेशाच्या शेवटीं "समाप्तोऽयं क्रियासारग्रन्थः" असा शेरा नजरचुकीनें दिला असावा. (ग्रन्थकाराच्या मतें) ३२ बत्तीस परंतु सध्यां उपलब्ध असलेल्या ३१ उपदेशांत पहिले चार उपदेश आद्य श्रीनीलकंठशिवाचार्य ह्यांनीं रचिलेल्या ब्रह्मसूत्रभाष्यावर कारिकारूपानें रचिले आहेत. वीरशैवमतसिद्धांताचें ज्ञान करून देणाऱ्या ग्रन्थांमध्यें वर निर्दिष्ट केलेलें भाष्य सोडून प्रस्तुत क्रियासारासारखा दुसरा प्रौढ ग्रन्थ आजमित्तीस तरी निदान उपलब्ध नाहीं, कारितां वीरशैवमत ह्मणजे काय आहे हें समजून घेण्याची ज्या विद्वानांना जिज्ञासा आहे त्यांना हा ग्रन्थ फार अनुकूल आहे. कारण वीरशैवमत व तदुक्त आचार ह्यांची सर्व बाजूंनीं सोपपत्तिक माहिती ह्यांत जितकी विस्तृत व सुलभ रीतीनें दिली आहे तितकी अन्यत्र मिळणें शक्य नाहीं. ह्मणूनच हा विद्वज्जनांस आदरणीय वाटेल असें आमचें मत आहे.

सदर्हू ३१ उपदेशांत कोणकोणते विषय आले आहेत हें उपोद्घातप्रकरणाच्या निराळ्या दिलेल्या सारांशावरून सहज लक्षांत येणार आहे. सदरील व्याख्यानाची १ च प्रत परमपूज्य, श्रीमद्वीरशैव महासभोत्पादक, हानगल श्रीमन्निरंजनकुमारमहास्वामींकडून आह्मांस मिळाली. तींत सुद्धां मूल ग्रन्थाच्या उपोद्घाताच्या पहिल्या १३ श्लोकांवरील व्याख्यान सोडून पुढें मूलग्रन्थाच्या द्वितीय उपदेशाच्या ६२६ व्या श्लोकापर्यंतचें मात्र व्याख्यान उपलब्ध आहे. अशा अमूल्य ग्रन्थाच्या व्याख्यानाची १ च प्रत मिळून त्यांतहि इतकी अव्यवस्था झालेली असावी हें वीरशैवमताचें मोठें दुर्भाग्य आहे असें समजलें पाहिजे. विशेष इतकेंच कीं मिळाली तेवढी प्रत बहुतांशीं शुद्ध होती एवढीच संतोषाची गोष्ट आहे. पुढील व्याख्यानग्रन्थही त्यांच्याच परिश्रमामुळें उपलब्ध होईल अशी आह्मांस पूर्ण आशा आहे. आतां मिळालें तेवढेंच व्याख्यान आह्मीं छापावयाचें सोडिलें तर पुढेंही कदाचित् तें नष्ट होण्याची भीति वाटल्यावरून मिळालेल्याचा निदान सर्वांना उपयोग व्हावा ह्या हेतूनें तितकेंच व्याख्यान आह्मीं छापून प्रसिद्ध केलें आहे हें व्याख्यान पाहतांच प्रत्येक वीरशैवाचें मन हा ग्रन्थ संपूर्ण प्राप्त होण्याविषयीं आतुर झाल्यावांचून राहणार नाहीं. शोध करून पुढें कोणी संपूर्ण क्रियासारव्याख्यान मिळवून दिलें तर पुनरावृत्ति काढणार आहों हें प्रत्येक वीरशैवानें लक्षांत ठेवावें.

ह्या क्रियासाराचा संपूर्ण मूल ग्रन्थ कै. ह्मैसूर यजमान वीरसंगप्पा ह्यांनीं कानडी लिपींत छापून कानडी लिपी जाणणाऱ्या वीरशैवांवर महदुपकार करून ठेविले आहेत. आह्मी झालें तरी तोच मूल ग्रन्थ आधार घेऊन देवनागरी लिपींत छापून प्रसिद्ध करीत आहों. केवल संस्कृत टीकेसहित हा अमूल्य ग्रन्थ जाणण्याची ज्यांची इच्छा आहे त्या वीरशैवमतजिज्ञासूंना ग्रन्थ सोईवार पडावा ह्मणून प्रस्तुत मूल ग्रन्थांतील ३१ उपदेशांपैकीं पहिले दोन उपदेश मात्र सांप्रत उपलब्ध असलेल्या टीकेसह निराळे छापिले आहेत. बाकीचा ग्रन्थ छापण्याचें काम चालू आहे. तें झालें ह्मणजे चार उपदेशांचा निराळा ग्रन्थ होणार आहे. ह्या ग्रन्थाच्या मूळांत तसेंच व्याख्यानांत जे जे ग्रन्थ प्रमाण ह्मणून घेतले आहेत ते वाचकांना सुलभ रीतीनें समजावेत ह्मणून आह्मीं त्या ग्रन्थांचे मूल आधार

तसेंच मूल ग्रन्थांतील जागजागीं श्लोकांतून येणारीं ब्रह्मसूत्रें स्पष्टपणें समजावीं ह्मणून मोठ्या मेहनतीनें यथाशक्ति साध्य होईल तितकें करून त्यावर ग्रन्थाखालीं टिपणी दिल्या आहेत. वाचकांना एवढीच सूचना आहे कीं, मूल ग्रन्थांत ब्रह्मसूत्रें घेऊन छंदोबद्ध रचना करितांना कांहीं सूत्रांतील शब्द मागेंपुढें झाले आहेत; कांहीं सूत्रांचा संक्षेप झाला आहे तर कांहीं सूत्रें विस्तृत असल्यामुळें दोन तीन श्लोकांत विभाग करून ग्रन्थकर्त्यास सांगावें लागल्यामुळें आह्मीं अशा स्थळीं सूत्राच्या एकाच मुख्य भागावर चिन्ह करून खालीं टिपणी दिली आहे. ह्याकरितां वाचकांनीं सूत्रसंगति लावून वाचण्याची काळजी घेतली पाहिजे. हा ग्रन्थ छापण्याच्यावेळीं ह्मैसूर गव्हरमेन्ट ओरियंन्टल लायब्ररींतून छापून प्रसिद्ध झालेलें ब्रह्ममीमांसा—श्रीकण्ठभाष्य व टिपणें देण्याच्या कामीं मि. कर्नल जी. ए. जेकब साहेब यांनीं रचिलेल्या उपनिषद्वाक्यकोश ह्या दोन ग्रन्थांचा फार उपयोग झाला त्याबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहों. मूलांत किंवा व्याख्यानांत कांहीं दृष्टिदोष असण्याचा संभव आहे. गुणग्राही जनांनीं ते आह्मांस कळविले असतां पुढील आवृत्तींत दुरुस्त करण्यांत येतील.

ह्या ग्रन्थाचें मूल संशोधन तसेंच मूल ग्रन्थांत आलेल्या सूत्रांचा व उपनिषदादि श्रुतिवचनांचा स्थलनिर्देश करून टिप्पणी देणें व प्रुफ तपास करणें ह्या कामांत वे॥ मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूर, वे॥ जगदीशशास्त्री नालवार वे॥ शा. सं. बाळकृष्णशास्त्री पेंढरकर ह्यांनीं फार मदत केली त्याबद्दल आह्मीं त्यांचे फार ऋणी आहों.

प्रसिद्धिकर्ता.

---

## विनंति

निजगुणाराध्यकृत, १ अनुभवसार, २ परमार्थगीता, ३ परमार्थप्रकाशिका, ४ कैवल्यपद्धति, ५ परमानुभवबोध, ६ पुरातनत्रिविडी हे सहा ग्रन्थ; तसेंच बसवेश्वरपुराण; बसवेश्वरवचन; प्रभुदेवपुराण; प्रभुदेववचन; चन्नबसवेश्वरपुराण; चन्नबसवेश्वरवचन; माचिदेवपुराण; माचिदेववचन; सिद्धरामेश्वरपुराण; सिद्धरामेश्वरवचन; त्याचप्रमाणें प्रमथांचीं पुराणें किंवा वचनें हीं, हल्लीं आह्मीं छापिलेल्या निजगुणराध्यकृत विवेकचिंतामणीप्रमाणेंच छापण्याची आमची इच्छा आहे. करितां हे मराठी ओवीबद्ध ग्रन्थ; तसेंच उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणांच्या संस्कृत धर्मग्रन्थांपैकीं कोणत्याहि पूर्ण अगर अपूर्ण ग्रन्थाच्या हस्तलिखित प्रती कोणाच्या संग्रहीं असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावबहादूर मल्लप्पा बसप्पा वारद सोलापूर ह्यांजकडे, आपली मूलप्रत छापून झाल्यानंतर आपणांस परत मिळण्याची इच्छेनुसार योग्य खात्री पटवून घेऊन, पाठविण्याची मेहेरबानी करावी; ह्मणजे त्यांसहि धर्मोन्नतीच्या कामीं हातभार लाविल्याचें श्रेय मिळेल. अशा रीतीनें मूलप्रत पाठविणारांकडे त्यांच्या मूलप्रतीसह दोन छापील प्रती पाठविण्यांत येतील.

प्रसिद्धिकर्ता.

---

# अनुक्रमाणिका.

## उपोद्धात प्रकरण.

| विषय. | पृष्ठ. |
| --- | --- |
| मंगलाचरण. ... ... ... ... ... ... ... | १ |
| ग्रन्थकारानें आपल्या आईबापाचें केलेलें स्तवन ... ... ... ... | १ |
| क्रियासार नामक ग्रन्थ रचण्यास श्रीशंकरानें आपणांस स्वप्नांत दर्शन देऊन आज्ञा केल्या-बद्दलचा ग्रन्थकाराचा उल्लेख ... ... ... ... ... | १ |
| वेद व आगम ह्यांत श्रीशंकरानें प्रतिपादन केलेले विषय मी विवरण करून सांगणार आहें अशी ग्रंथकाराची प्रतिज्ञा ... ... ... ... ... ... | २ |
| वेद व आगम ह्यांस समप्रामाण्य आहे ह्याविषयीं प्रतिपादन ... ... ... | २ |
| आगम दोन प्रकारचे आहेत ह्याविषयीं ... ... ... ... ... | २ |
| वीरशैवांचे आगमोक्त आचार वेदप्रतिपादित आहेत ह्याविषयीं कथन ... ... | २ |
| धर्मसूत्रें, श्रुति, स्मृति व पुराणें ह्यांत वीरशैवांचे धर्माचार सांगितलेले नसल्यामुळें त्या धर्माचारांस वैदिकत्व कसें प्राप्त होतें? ह्या शंकेचें वैदिकत्व आहे असें समाधान... | ३ |
| वीरशैवांच्या धर्माचारांस वर सांगितलेलें वैदिकत्व दुसऱ्या रीतीनें सिद्ध करून दाखवितो | ४ |
| श्वासरूप वेदांपेक्षां शिवमुखांतून निघालेल्या शैवागमांस अधिक प्रामाण्य आहे ह्याविषयीं.. | ४ |
| ह्या ग्रंथांत सांगितलेल्या ३१ उपदेशांतील प्रत्येक उपदेशांत काय काय सांगितलें आहे ह्याचा गोषवारा ... ... ... ... ... ... | ४-५ |
| वेदांगांविषयीं वर्णन ... ... ... ... ... ... ... | ६ |
| ऋग्वेदादि वेदचतुष्टयाचे भेद ... ... ... ... ... ... | ६ |
| प्रसिद्ध उपनिषदांचें संख्याकथन... ... ... ... ... ... | ६ |
| पुराणें किती आहेत ह्याविषयीं प्रतिपादन ... ... ... ... ... | ६ |
| उपपुराणें, न्याय व मीमांसा ह्यांचीं नांवें ... ... ... ... ... | ७ |
| अठरा स्मृतींचीं नांवें... ... ... ... ... ... ... | ७ |
| उपस्मृतिकारांचीं नांवें.. ... ... ... ... ... ... | ७ |
| शिवोक्त शिवागमांचें संख्याकथन.. ... ... ... ... ... | ७ |
| शिवोक्त अन्य तंत्रांचा नामनिर्देश. ... ... ... ... ... | ७ |
| सर्व विद्यांमध्यें वीरशैवविद्या उत्कृष्ट आहे ह्याविषयीं प्रतिपादन ... ... ... | ८ |

## उपदेश १ ला.

| | |
| --- | --- |
| वीरशैव विद्येस वेदमूलत्व आहे ह्याविषयीं... ... ... ... ... | १ |
| वीरशैवांचें लक्षण ... ... ... ... ... ... ... | १ |
| पिंडस्थलापासून ज्ञानशून्यस्थलापर्यंत १०१ स्थलें व भक्तस्थलादि ६ स्थलें हीं सर्व स्थलें जाणण्याची ज्यास इच्छा आहे तोच वीरशैव विद्या जाणण्यास अधिकारी होतो ह्याविषयीं | ५ |
| अष्टावरण व पंचाचार पाळणारा पुरुषहि वीरशैव विद्येस अधिकारी होतो ... ... | ५ |

विषय. पृष्ठ.

भक्तानें गुरुसेवा करावी ... ... ... ... ... ... ६
गुरूच्या सान्निध्यानेंच ब्रह्मा, विष्णु, इत्यादि देवांस व सनत्कुमारादि गणेश्वरांस लिंगांग-सामरस्यप्राप्ति झाली ... ... ... ... ... ... ६
दुंडिनंदिप्रभृति १४ हजार प्रमथगण शिवसान्निध्यानें मतप्रवर्तक झाले ... ... ७
अगस्त्य, जैमिनि, विश्वामित्र, काश्यप इत्यादि वीरशैव ऋषी जीवन्मुक्त व धन्य झाले ... ७
शिव सर्वांचा गुरु आहे. शिवोक्त आगम व वेद, स्मृति, विद्या ह्यांस प्रामाण्यकथन ... ८
व्यासाला शिवदीक्षेनें आलेलें वीरशैवत्व व शिवभक्तीनें पशु, पाश, व पति ह्यांचें ज्ञान होऊन त्यास तत्वज्ञान झालें ह्याविषयीं ... ... ... ... ८
व्याससूत्रांस शिवज्ञान मूल आहे ह्याविषयीं कथन ... ... ... ... ९
आप्त ( ऋषि ) वचनांवर विश्वास न ठेवणारे लोक आपल्या मनाप्रमाणें सूत्रार्थ करितात १२
जीवात्मा व परमात्मा ह्या दोन पदार्थांचें निरूपण ... ... ... ... १३
सर्वसाक्षी शिवोपासकास सालोक्य नांवाची मुक्ति मिळते ह्याविषयीं निरूपण ... १३
निर्विकल्प स्वरूपी शिवाचें पूजन कसें करावें ह्याविषयीं समाधान ... ... १३
अनेक मतांचे लोक माझ्या सूत्रांचे निरनिराळे अर्थ करून परस्परांशीं भांडतात तर आपण माझ्या सूत्रांचा खरा अर्थ करून सांगा अशी व्यासानें श्रीशंकराची प्रार्थना केल्यामुळें त्यांनीं श्रीनीलकंठशिवाचार्य हें नांव धारण करून सूत्रभाष्य केलें ... ... १४
श्रीनीलकंठशिवाचार्यांनें शक्तिविशिष्टाद्वैतसिद्धान्तप्रतिपादक भाष्य रचिलें ... ... १५
शक्तिविशिष्ट ब्रह्मच जगत्कारण आहे ह्या भाष्योक्त सिद्धांताला अनुसरून कारिकारूपानें भाष्याचा तात्पर्यार्थ प्रतिपादन करितों अशी ग्रन्थकर्त्याची प्रतिज्ञा ... ... १५
वीरशैवांस शिवपूजेनें मुक्ति लाभते ह्याविषयीं प्रतिपादन ... ... ... १६
शिवलिंगाची पर्यायनांवें व्यासानें सूत्रांत सांगितलीं आहेत तींच श्रीनीलकंठशिवाचार्यांनीं प्रतिपादिलीं आहेत ह्याविषयीं ... ... ... ... ... १७
"अथातो ब्रह्मजिज्ञासा" ह्या सूत्राचें शक्तिविशिष्ट ब्रह्मस्वरूप इष्टलिंगपर अर्थप्रतिपादन ... १८
ब्रह्मलक्षणप्रतिपादक, "जन्माद्यस्य यतः" ह्या सूत्राचा अर्थ— चिच्छक्तिविशिष्टब्रह्मरूपी शिव सकल प्रपंचास कारण आहे—असा प्रतिपादिला आहे.. ... ... ५१
ब्रह्माच्या सद्भावाविषयीं प्रमाण दाखवितांना "शास्त्रयोनित्वात्" ह्या सूत्राचा अर्थ "सर्व शास्त्रांचा आदिकर्ता शिवच आहे" असें प्रतिपादन करितात. ह्याविषयीं.. ... ५६
वेदांतवाक्यें ब्रह्मबोधक आहेत असें सांगण्याच्या हेतूनें "तत्तु समन्वयात्" ह्या सूत्राचा अर्थ करीत असतांना शिवच परब्रह्म आहे व मोक्षार्थी लोकांनीं त्याचेंच ध्यान करावें असें प्रतिपादन केलें आहे... ... ... ... ... ... ५८
"ईक्षतेर्नाशब्दं" ह्या सूत्राच्या अर्थाचें प्रतिपादन करीत असतां पूर्वोक्त ब्रह्मलक्षण प्रधानास ( प्रकृतीस ) लागत नाहीं असें प्रतिपादन केलें आहे ... ... ... ६४

| विषय. | पृष्ठ. |
| --- | --- |
| प्रधानास गौणेक्षण आहे ह्या शंकेचें खंडन करण्याकरितां "गौणश्चेन्नात्मशब्दात्" ह्या सूत्राचें प्रतिपादन केलें आहे ... ... ... ... ... ... | ६५ |
| "तन्निष्ठस्य मोक्षोपदेशात्" ह्या सूत्राचा अर्थ असा केला आहे कीं, ब्रह्म सच्छब्दवाच्य आहे व ब्रह्मच इष्टलिंग आहे, इष्टलिंगाचें धारण करावें, लिंगांगसामरस्यानें ब्रह्मभाव प्राप्त होतो इत्यादि ... ... ... ... ... ... ... | ६५ |
| "हेयत्वावचनाच्च" "प्रतिज्ञाविरोधात्" "स्वाप्ययात्" "गतिसामान्यात्" "श्रुतत्वाच्च" ह्या सूत्रांचा अर्थ ब्रह्मच सच्छब्दवाच्य आहे, प्रधान (प्रकृति) नाहीं असें प्रतिपादन केलें आहे ... ... ... ... ... ... ... | ६९ |
| "आनंदमयोऽभ्यासात्" ह्या सूत्रापासून "अस्मिन्नस्य च तद्योगं शास्ति" ह्या विसाव्या सूत्रापर्यंत परब्रह्मच आनंदमय आहे असें प्रतिपादन करितात ... ... ... | ७० |
| "अन्तस्तद्धर्मोपदेशात्" "भेदव्यपदेशाच्चान्यः" ह्या सूत्रांचा अर्थ— सर्व जीवांना परमेश्वरच उपास्य, दुसरें कोणी नाहीं असा प्रतिपादन करितात ... ... ... | ७४ |
| "आकाशस्तल्लिंगात्" ह्या सूत्राचा अर्थ—आकाश केवल ब्रह्म आहे—असा सांगतात ... | ७४ |
| "अत एव प्राणः" ह्या सूत्राचा अर्थ—प्राणहि ब्रह्म आहे असें प्रतिपादिलें आहे... ... | ७५ |
| "ज्योतिश्चरणाभिधानात्" ह्या सूत्राचा अर्थ—ज्योतिःशब्दवाच्य ब्रह्मपर केला आहे ... | ७६ |
| "छन्दोऽभिधानान्नेति चेन्न तथा चेतोऽर्पणनिगदात्तथाहि निदर्शनम्" ह्या सूत्राचा अर्थ— गायत्रीशब्दवाच्य ब्रह्म आहे असा सांगितला आहे ... ... ... | ७६ |
| "भूतादिपादव्यपदेशोपपत्तेश्चैवम्" "उपदेशभेदान्नेतिचेन्नोभयस्मिन्नप्यविरोधात्" "प्राणस्तथानुगमात्" ह्या सूत्रांचा अर्थ प्राणशब्दवाच्य ब्रह्म आहे असा सांगितला आहे ... | ७७ |
| "न वक्तुरात्मोपदेशादिति चेदध्यात्मसंबंधभूमा ह्यस्मिन्" "शास्त्रदृष्ट्या तूपदेशो वामदेववत्" "जीवमुख्यप्राणलिंगान्नेति चेन्नोपासनात्रैविध्यादाश्रितत्वादिह तद्योगात्" ह्या सूत्रांचा अर्थ—ह्या अध्यायांत ब्रह्मच मुख्य आहे; तें ब्रह्म ह्मणजे इष्टलिंग होय; मोक्षार्थी लोकांनीं प्राणलिंग हृदयाचे ठिकाणीं धारण करावें; तें ब्रह्मरूपी लिंगधारण, त्याचें पूजन, पंचाचार, अष्टावरण, षट्स्थलतत्वज्ञान हीं वीरशैवांना मुक्ति देणारीं आहेत असा प्रतिपादिला आहे ... ... ... ... ... ... ... | ७८ |
| "सर्वत्र प्रसिद्धोपदेशात्" ह्या सूत्राचा अर्थ शिवच सर्वांना उपास्य आहे; त्यालाच ब्रह्म ह्मणतात, लिंग ह्मणतात. शिवलिंगाचीच उपासना करावी असा सांगितला आहे... | ८० |
| "विवक्षितगुणोपपत्तेश्च" ह्या सूत्रापासून ८ व्या सूत्रापर्यंत सर्व सूत्रांचा अर्थ ब्रह्मच केवल उपास्य आहे. दुसऱ्याची कोणाचीहि उपासना करूं नये असा केला आहे ... | ८२ |
| "संभोगप्राप्तिरितिचेन्न वैशेष्यात्" ह्या सूत्राचा अर्थ असा प्रतिपादन केला आहे कीं जीवालाच भोग आहे.. ... ... ... ... ... ... | ८३ |
| "अंतर उपपत्तेरित्यादि" सूत्राचा अर्थ—ब्रह्मविषयक चर्चा करावी असा आहे ... | ८५ |

विषय. पृष्ठ.

"अदृश्यत्वादिगुणको धर्मोक्तेः" इत्यादि सूत्रांचा अर्थ—ब्रह्मासच धर्म आहे, दुसऱ्यास नाहीं असा सांगितला आहे ... ... ... ... ... ... ८७

"द्युभ्वाद्यायतनं स्वशब्दात्" इत्यादि ह्या सूत्रार्थांत—परब्रह्मच द्युभ्वाद्यायतन होय अन्य वस्तु होत नाहीं असें प्रतिपादन केलें आहे... ... ... ... ... ९२

"भूमा संप्रसादादध्युपदेशात्" इत्यादि ह्या सूत्रांच्या व्याख्यानांत परमेश्वरच "भूमा" शब्दानें वाच्य आहे दुसरा नाहीं असें प्रतिपादिलें आहे ... ... ... ९३

"अक्षरमंबरांतधृतेः" इत्यादि सूत्रांचा अर्थ—परब्रह्मच अक्षरशब्दवाच्य आहे. तेंच लिंग आहे. ॐतद्ब्रह्मेत्यादिवाक्यानें ब्रह्मरूपी लिंगधारण करावें असें प्रतिपादन केलें आहे ९४

"ईक्षतिकर्मव्यपदेशात्सः" इत्यादि सूत्रांचा अर्थ— परशिवाची हृदयाकाशांत उपासना करावी; दहरकमलामध्यें ब्रह्मरूपी लिंगधारण करावें; ज्याच्या हृदयाच्या ठिकाणीं लिंग असतें तो लिंगैक्य पावून शिव होतो ह्याकरितां अक्षर-प्रणव-ब्रह्मच उपास्य असून ध्यानास योग्य आहे—असा निरूपण केला आहे... ... ... ... ९५

"दहर उत्तरेभ्यः" ह्या सूत्राचा अर्थ—परमेश्वर उपास्य आहे असा सांगितला आहे ... ९६

"गतिशब्दाभ्यां तथाहि दृष्टं लिंगं च" इत्यादि सूत्रांचा अर्थ—परशिवाची हृत्कमलांत उपासना करावी—संध्यावंदनाप्रमाणें दहराकाशांत परशिवरूपलिंग जीव असेपर्यंत धारण करावें असा प्रतिपादन केला आहे ... ... ... ... ... ९६

"धृतेश्च महिम्नोऽस्यास्मिन्नुपलब्धेः" इत्यादि सूत्रांचा अर्थ—हृदयावर ब्रह्मरूपलिंग धारण करावें व त्याचें ध्यान करावें—असा सांगितला आहे ... ... ... ९७

"उत्तराच्चेदाविर्भूतस्वरूपस्तु" इत्यादि सूत्रांचा अर्थ—श्रुतिसूत्रन्यायरीतीनें लिंगधारण करावें इत्यादि—प्रतिपादन केला आहे ... ... ... ... ... ९७

"शब्दादेव प्रमितः" "हृद्यपेक्षया तु मनुष्याधिकारत्वात्" "तदुपर्यपि बादरायणःसंभवात्" इत्यादि सूत्रांचा अर्थ— जन्मकर्मनिवारणाकरितां लिंगधारण करून पूजा करावी व त्याचें ध्यान करावें. विष्ण्वादि देवांनीं पूजिलेलें लिंग देवांनीं व मनुष्यांनीं हृदयीं धारण करून त्याचें पूजन करावें—असा प्रतिपादिला आहे ... ... ... ९८

"विरोधः कर्मणीति चेन्नानेकप्रतिपत्तेर्दर्शनात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत मनुष्यांना व देवांना लिंगधारण करण्याचा अधिकार आहे; परंतु स्त्रीशूद्रांना अधिकार आहे किंवा नाहीं असे आक्षेप घेऊन समाधान केलें आहे ... ... ... ... ९९

"भावं तु बादरायणोऽस्ति हि" इत्यादि सूत्रार्थांत—संस्कारयुक्त सर्व मनुष्यांस लिंगधारण करण्यास अधिकार आहे असें प्रतिपादन केलें आहे ... ... ... १०१

"संस्कारपरामर्शात्तदभावाभिलापाच्च" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत— शूद्रांना संस्कार नसल्या कारणानें लिंगधारण करण्याचा त्यांना अधिकार नाहीं व मुमुक्षूनें सनातन ब्रह्मलिंग हृदयांत सदा धारण करून त्याचें पूजन करावें—असें सांगितलें आहे ... ... १०३

लिंगस्वरूपाचें निरूपण ... ... ... ... ... ... १०४

विषय. पृष्ठ.

वेदान्तांत सांगितलेला लिंगमहिमा जाणून जो पुरुष लिंगांगसामरस्यानें हृदयावर लिंगधारण करितो तो परमेश्वरच आहे व पुष्कळ सूत्रांत लिंगधारण करावें असें प्रतिपादिलें आहे ... ... ... ... ... ... ... १०७
"आनुमानिकमप्येकेषामिति चेन्न शारीररूपकविन्यस्तगृहीतेर्दर्शयति च" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत सांगितलेलें ब्रह्मलक्षण प्रधानादींच्या ठिकाणीं येतें अशी शंका घेऊन तिचें समाधान केलें आहे. ... ... ... ... ... ... १०८
"तदधीनत्वादर्थवत्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—प्रधान अव्यक्त नाहीं असें निरूपण केलें आहे १०९
"वाक्यान्वयात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—परब्रह्मलिंगाची बुद्धिमानानें हृदयांत उपासना करावी व लिंगधारण करावें असें सांगितलें आहे... ... ... ... ११२
"अवस्थितेरिति काशकृत्स्नः" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत—जीव उपासक आहे व ब्रह्म उपास्य आहे. लिंगांगसामरस्यानें भेदाभेद आहेत इत्यादि निरूपण ... ... ११४
"एतेन सर्वे व्याख्याता व्याख्याताः" ह्या सूत्राच्या अर्थांत—श्रुति, लिंग, वाक्य, प्रमाण इत्यादींनीं सर्व वाक्यांचा ब्रह्मपर अर्थ लावून मुमुक्षूनें हृदयांत ब्रह्मरूप लिंग धारण करावें व त्याचें पूजन करावें असें प्रतिपादन केलें आहे... ... ... ... ११५
शिवलिंगाच्या पूजेचें फल व लिंगधारणाचें फल ह्यांविषयीं निरूपण ... ... ११६
वीरशैवागमांत सांगितलेले अर्थच व्याससूत्रांत आहेत. ह्यास कांहीं सूत्रांचें उदाहरण देऊन शैवागमांस व व्याससूत्रांस समानार्थत्व आहे असें दाखविलें आहे ... ... ११७
जीव व ब्रह्म ह्यांचें स्वरूपनिरूपण, त्यांचा भेदाभेद इत्यादि प्रतिपादन ... ... ११७

## द्वितीयोपदेश.

प्रपंचास कारणीभूत असलेल्या ब्रह्मांत—सर्व वेदांतवाक्यांचा समन्वय केल्यानें त्या वाक्यांला स्मृत्यादि वाक्यांचा येणारा विरोध परिहार केला आहे ... ... ... १२३
कर्मकांडापेक्षां ज्ञानकांडास प्राधान्य कथन केलें आहे ... ... ... ... १२३
लिंगांगैक्याचा समन्वय करितांना स्मृति-विरोध आला असतां त्याचें निवारण करण्याकरितां "स्मृत्यनवकाशदोषप्रसंग इति चेन्नान्यस्मृत्यनवकाशदोषप्रसंगात्" ह्या सूत्राच्या अर्थ-विचारानें त्या दोषांचा परिहार केला आहे ... ... ... ... १२४
"इतरेषां चानुपलब्धेः" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—अनेक लोक अनेक रीतीनें ब्रह्मस्वरूप समजून घेऊन त्यास अनेक नांवें देतात इत्यादि प्रतिपादन केलें आहे ... ... १२५
"एतेन योगःप्रत्युक्तः" ह्या सूत्राच्या अर्थांत— लिंगांगरूप जीवात्मा व परमात्मा ह्यांचा सामरस्यरूप अर्थ, ब्रह्मस्वरूपलिंगाचें हृदयकमलांत धारण; ब्रह्मच जगत्कारण आहे व प्रधान जगत्कारण नाहीं. इत्यादि विषयांचें प्रतिपादन आहे... ... ... १२८
"सर्वधर्मोपपत्तेश्च" ह्या सूत्राच्या अर्थांत—ब्रह्म सर्वसाक्षी आहे असें सांगून तें शक्तिविशिष्ट व जगत्कारण आहे इत्यादि विषयांचें निरूपण केलें आहे ... ... १३५

विषय. पृष्ठ.

"रचनानुपपत्तेश्च नानुमानं प्रवृत्तेश्च" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत—ब्रह्मकारणतावादांत सांख्यादींनीं जें दूषण दिलें त्याचा परिहार करून सांख्यादिमतांचें खंडन केलें आहे व प्रधानास येऊं पहाणाऱ्या कारणत्वाचें खंडन केलें आहे. इत्यादि ... ... १३७

"महद्दीर्घवद्वा ह्रस्वपरिमंडलाभ्याम्" इत्यादि सूत्रांचे अर्थांत—प्रधान कारणवादाचें निराकरण करून नंतर परमाणु कारणवादाचें निराकरण केलें आहे... ... ... १४२

"समुदाय उभयहेतुकेऽपि तदप्राप्तिः" इत्यादि सूत्रांचें अर्थांत बौद्धमताचें खंडन केलें आहे १४७

"उत्तरोत्पादे च पूर्वनिरोधात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—क्षणवाद्यांचें मतखंडन केलें आहे १५०

"प्रतिसंख्याऽप्रतिसंख्यानिरोधाप्राप्तिरविच्छेदात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत वैनाशिकमताचें खंडन केलें आहे ... ... ... ... ... ... १५१

क्षपणकमतखंडननिरूपण ... ... ... ... ... ... १५८

"एवं चात्माकार्त्स्न्यम्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—आर्हतमतखंडन केलें आहे... ... १६१

"पत्युरसामंजस्यात्" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत—ईश्वरकारणवादमताचें खंडन केलें आहे १६१

"उत्पत्त्यसंभवात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—पांचरात्रमताचें खंडन केलें आहे व शास्त्रतव मुमुक्षु जनांनीं हृदयावर लिंगधारण करावें असें सांगितलें आहे ... ... १६३

"न वियदश्रुतेः" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—आकाशोत्पत्ति नाहीं असें प्रतिपादिलें आहे १६६

"एतेन मातरिश्वा व्याख्यातः" इत्यादि सूत्रांचे अर्थांत-वायूला उत्पत्ति नाहीं असें प्रतिपादिलें आहे १६७

"तेजोऽतस्तथाह्याह" "आपः" "पृथिवी" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—परब्रह्मापासून पंचभूतोत्पत्ति झाल्याचें सांगितलें आहे ... ... ... ... ... १६८

"तदभिध्यानादेव तु तल्लिंगात्सः" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत— जगताला कारण केवल ईशमात्र आहे असें प्रतिपादिलें आहे ... ... ... ... ... १६८

"विपर्ययेण तु क्रमोऽत उपपद्यते च" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—प्रपंच कसा उत्पन्न झाला हें सांगितलें आहे ... ... ... ... ... ... १६९

"ज्ञोऽत एव" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—आत्मा ज्ञानस्वरूप आहे असें प्रतिपादन केलें आहे १७१

"उत्क्रांतिगत्यागतीनाम्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—जीवास अणुत्व व ज्ञातृत्व ह्यांचें स्वरूप आहे असें निरूपण केलें आहे ... ... ... ... ... १७१

"कर्ता शास्त्रार्थवत्त्वात्" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत जीवात्म्याला कर्तृत्वनिरूपण केलें आहे १७५

"अंशो नानाव्यपदेशादन्यथा चापि दाशकितवादित्वमधीयत एके" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत, जीव ईशांश आहे व जीवेशास अभेद प्रतिपादिला आहे ... ... ... १७६

"तथा प्राणाः" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत—प्राणास उत्पत्ति गौण आहे असें प्रतिपादन केलें आहे १८२

"अणुश्च" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत मुख्य प्राण अणु आहे असें निरूपिलें आहे ... १८२

"तस्य च नित्यत्वात्" इत्यादि सूत्रांच्या अर्थांत---प्राण व जीव ह्यांचा नित्य संबंध असल्याचें प्रतिपादिलें आहे ... ... ... ... ... ... १८३

"त इंद्रियाणि तद्व्यपदेशादन्यत्र श्रेष्ठात्" इत्यादि सूत्रांच्या व्याख्यानांत—प्राणांपासून वागादि तत्त्वांतरांची उत्पत्ति सांगितली आहे... ... ... ... ... १८३

ब्रह्मसंज्ञकलिंग हृदयकमलांत धारण करावें असें निरूपण ... ... ... १८४

# विषयानुक्रमणिका.

## उपोद्घातप्रकरणे


| विषयः | पत्रम् |
|---|---|
| मंगलाचरणम् ... ... .. ... ... ... ... | १ |
| ग्रंथकर्तुर्जननीजनकस्तोत्रम् ... ... ... ... ... ... | १ |
| क्रियासारनामकप्रबंधं कुर्वीति श्रीशंकरस्याज्ञा ... ... ... ... | १ |
| श्रीशंकरोक्तशैवागमादिवचनसंग्रहं कृत्वा स्वप्नलब्धोपदेशो नीलकंठोऽहं क्रियासारं करोमीति प्रतिज्ञा ... ... ... ... ... ... ... | १ |
| श्रीशंकरमुखनिर्गतनिगमागमवर्त्मना राद्धांतं नीलकंठस्तनोति ... ... ... | २ |
| वेदागमसमप्रामाण्यप्रतिपादनम् ... ... ... ... ... ... | २ |
| आगमद्वैविध्यनिरूपणम् ... ... ... ... ... ... | २ |
| वीरशैवानामागमा वैदिका मताः ... ... ... ... ... ... | २ |
| धर्मसूत्रश्रुतिपुराणादिषु वीरशैवधर्माविधानात्कथं वैदिकत्वमित्याशंक्य वीरशैवागमानां वैदिकत्वनिरूपणम् ... ... .. ... ... ... ... | २-३ |
| वीरशैवस्य वेदानिंदितत्वे युक्त्युपपादनम् ... ... ... ... ... | ४ |
| शिवनिश्वासरूपवेदेभ्यः साक्षाच्छिवमुखनिर्गतशैवागमानामाधिक्यनिरूपणम् ... ... | ४ |
| द्वात्रिंशदुपदेशोक्तविषयाः ... ... ... ... ... ... | ४-५ |
| वेदांगनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | ६ |
| ऋग्वेदादिस्थितभेदनिरूपणम् ... ... ... ... ... ... | ६ |
| प्रसिद्धोपनिषद्गणनिरूपणम् ... ... ... ... ... ... | ६ |
| अष्टादशपुराणनामानि ... ... ... ... ... ... | ६ |
| उपपुराणनामानि ... ... ... ... ... ... ... | ७ |
| वेदोपांगनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | ७ |
| अष्टादशस्मृतिनामनिरूपणम् ... ... ... ... ... ... | ७ |
| उपस्मृतिकर्तृनामानि ... ... ... ... ... ... | ७ |
| शैवागमनामानि ... ... ... ... ... ... ... | ७ |
| शिवोक्तान्यतंत्रनामानि ... ... ... ... ... ... | ७ |
| सर्वविद्याप्रामाण्येऽपि वीरशैवविद्यायाः सर्वोत्कृष्टत्वप्रतिपादनम् ... ... ... | ८ |


## प्रथमोपदेशे.


| | |
|---|---|
| वीरशैवविद्याया वैदिकत्वनिरूपणम् ... ... ... ... ... | १ |
| वीरशैवशब्दनिर्वचनम्... ... ... ... ... ... | १ |
| अधिकारिस्वरूपनिरूपणम् ... ... ... ... ... ... | ५ |

| विषयः | पत्रम् |
|---|---|
| अष्टावरणपंचाचारवानधिकारी भवतीति प्रतिपादनम् ... ... ... ... | ५ |
| गुरुसेवानिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | ६ |
| गुरूपसदनाद्ब्रह्मविष्ण्वादिदेवानां सनत्कुमारप्रमुखगणेश्वराणां च लिंगांगसामरस्यप्राप्तिनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | ६ |
| ढुंडिनंदिप्रमुखचतुर्दशसहस्रप्रमथगणानां शिवसान्निध्यान्मतप्रवर्तकत्वनिरूपणम्... ... | ७ |
| अगस्त्यजैमिनिविश्वामित्रकाश्यपेत्यादय ऋषयो वीरशैवा जीवन्मुक्ता इति प्रतिपादनम् ... | ७ |
| सर्वेषां गुरुराद्यः शिवस्तन्मुखोत्पन्नवेदकामिकाद्यागमस्मृत्यादिविद्यानां प्रामाण्यनिरूपणम् ... | ८ |
| दीक्षां गतस्य व्यासस्य वीरशैवत्वनिरूपणं तस्य शिवभक्त्या पशुपाशपतिज्ञानप्राप्तिनिरूपणंच | ८ |
| व्याससूत्राणां शिवज्ञानमूलत्वकथनम् ... ... ... ... ... | ११ |
| आप्तवचनविश्वासरहिता यथायथं सूत्रार्थमुपवर्णयंति तन्निराकरणद्वारा यथाकथं सूत्रार्थस्थापनमात्मीयप्रबंधस्य प्रयोजननिरूपणम्... ... ... ... ... | १२ |
| जीवात्मपरमात्मद्विविधपदार्थनिरूपणम् ... ... ... ... ... | १३ |
| सर्वसाक्षिशिवोपासनस्य सालोक्यनामिका मुक्तिः ... ... ... ... | १३ |
| निर्विकल्पस्वरूपस्य कथं पूजोपासनमित्याशंक्य समाधाननिरूपणम्... ... ... | १३ |
| अनेकमतलोकैः मत्कृतसूत्राणामयथार्थं कृत्वा परस्परं कलहः क्रियते तस्मात् यथार्थं मत्सूत्रार्थविवेचनं त्वया कार्यमिति श्रीशंकरंप्रति व्यासस्य प्रार्थना तदनंतरं श्रीशंकरः नीलकंठशिवाचार्यनाम्ना भाष्यमकरोदितिनिरूपणम् ... ... ... ... | १४ |
| श्रीनीलकंठशिवाचार्येण शक्तिविशिष्टाद्वैतमतसिद्धांतप्रतिपादनं कृतमितिनिरूपणम्. ... | १५ |
| शक्तिविशिष्टं ब्रह्म जगत्कारणमिति भाष्योक्तसिद्धांतमनुसृत्य कारिकारूपेण भाष्यतात्पर्यार्थ--प्रतिपादनम् ... ... ... ... ... ... ... | १५ |
| वीरशैवानां शिवपूजया मुक्तिलाभनिरूपणम्... ... ... ... ... | १६ |
| शिवलिंगपर्यायनामानि व्याससूत्रेषु विचारिताभिप्रायस्य श्रीनीलकंठेनाविष्करणंच ... | १७ |
| "अथातो ब्रह्मजिज्ञासा" एतत्सूत्रस्य शक्तिविशिष्टब्रह्मस्वरूपेष्टलिंगपरार्थप्रतिपादनम् ... | १८ |
| ब्रह्मलक्षणप्रतिपादकेन "जन्माद्यस्य यतः" एतत्सूत्रेण चिच्छक्तिविशिष्टब्रह्मभूताशिवस्य सकलप्रपंचकारणत्वनिरूपणम् ... ... ... ... ... ... | ५१ |
| ब्रह्मसद्भावे प्रमाणशास्त्रदर्शनाय "शास्त्रयोनित्वात्" इत्येतत्सूत्रस्य सर्वशास्त्राणामादिकर्ता शिव एवेत्यर्थप्रतिपादनम् ... ... ... ... ... | ५६ |
| वेदांतवाक्यानां ब्रह्मबोधकत्वनिरूपणार्थं "तत्तु समन्वयात्" इति सूत्रमुक्तं। तत्सूत्रस्य शिवएव परब्रह्म तस्यैव मुमुक्षुभिः ध्यानं कर्तव्यमित्यर्थनिरूपणम्... ... ... | ५८ |
| "ईक्षतेर्नाशब्दं" एतत्सूत्रस्य उपरिनिर्दिष्टब्रह्मलक्षणं प्रधाने (प्रकृतौ) न संभवतीत्यर्थप्रतिपादनम् | ६४ |
| प्रधाने गौणेक्षणखंडनार्थं "गौणश्चेन्नात्मशब्दात्" इति सूत्रमुक्तम् ... ... ... | ६५ |
| "तन्निष्ठस्य मोक्षोपदेशात्" इति सूत्रेण सच्छब्दवाच्यं ब्रह्म वर्तते ब्रह्मैवेष्टलिंगं तस्मादिष्टलिंगस्य धारणमवश्यं कर्तव्यं लिंगांगसामरस्येन च ब्रह्मत्वप्राप्तिर्भवतीत्यर्थप्रतिपादनम्... | ६५ |

| विषयः | पत्रम् |
|---|---|
| "हेयत्वावचनाच्च" "प्रतिज्ञाविरोधात्" "स्वाप्ययात्" "गतिसामान्यात्" "श्रुतत्वाच्च" इत्यादिसूत्राणां ब्रह्मैव सच्छब्दवाच्यं भवति प्रधानं न इत्यर्थप्रतिपादनम् ... ... | ६९ |
| "आनंदमयोऽभ्यासात्" एतत्सूत्रप्रभृति "अस्मिन्नस्य च तद्योगं शास्ति" इत्यंतसूत्राणां परब्रह्मैव आनंदमयम् इत्यर्थनिरूपणम् ... ... ... ... | ७० |
| "अंतस्तद्धर्मोपदेशात्" "भेदव्यपदेशाच्चान्यः" इत्यादिसूत्राणां सर्वप्राणिभिःपरमेश्वर एवोपास्यो नान्य इत्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... | ७४ |
| "आकाशस्तल्लिंगात्" इति सूत्रस्य आकाशः परंब्रह्मेत्यर्थप्रतिपादनम् ... ... | ७५ |
| "अत एव प्राणः" इति सूत्रस्य ब्रह्मैव प्राण इत्यर्थनिरूपणम् ... ... ... | ७५ |
| "ज्योतिश्चरणाभिधानात्" इति सूत्रस्य ज्योतिश्शब्दवाच्यं ब्रह्मैवेत्यर्थप्रतिपादनम् ... | ७६ |
| "छंदोऽभिधानान्नेति चेन्न तथा चेतोऽर्पणनिगदात्तथाहि निदर्शनम्" इति सूत्रस्य गायत्री शब्दवाच्यं ब्रह्मैवेत्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... | ७६ |
| "भूतादिपादव्यपदेशोपपत्तेश्चैवम्" "उपदेशभेदान्नेति चेन्नोभयस्मिन्नप्यविरोधात्" "प्राणस्तथाऽनुगमात्" एतत्सूत्राणां प्राणशब्दवाच्यं ब्रह्मेत्यर्थप्रतिपादनम् ... ... | ७७ |
| "न वक्तुरात्मोपदेशादिति चेदध्यात्मसंबंधभूमा ह्यस्मिन्" "शास्त्रदृष्ट्या तूपदेशो वामदेववत्" "जीवमुख्यप्राणलिंगान्नेति चेन्नोपासनात्रैविध्यादाश्रितत्वादिह तद्योगात्" इत्यादिसूत्रैरस्मिन्नध्याये ब्रह्मैव मुख्यं। तद्ब्रह्म लिंगं वर्तते । तस्मान्मोक्षार्थी प्राणलिंगं हृदब्जे धारयेत्। लिंगधारणं पूजनमित्यादि वीरशैवानां पंचाचाराष्टावरणषट्स्थलतत्वज्ञानं मुक्तिसाधनमित्यर्थप्रतिपादनम् ... ... ... ... ... | ७८ |
| "सर्वत्र प्रसिद्धोपदेशात्" इति सूत्रस्य शिवस्यैव सर्वैरुपास्यत्वं तस्यैव ब्रह्मलिंगमिति गीयते तस्माच्छिवलिंगस्योपासना कर्तव्येत्यर्थप्रतिपादनम् ... ... ... ... | ८० |
| "विवक्षितगुणोपपत्तेश्च" इत्यादिसूत्राणां ब्रह्मण एवोपसना कर्तव्या नान्येषामित्यर्थप्रतिपादनम् | ८२ |
| "संभोगप्राप्तिरिति चेन्न वैशेष्यात्" अस्य सूत्रस्य जीवस्यैव भोगः न परस्येत्यर्थप्रतिपादनम् | ८३ |
| "अन्तर उपपत्तेः" इत्यादिसूत्रैः ब्रह्मविषयकविचारः ... ... ... ... | ८५ |
| "अदृश्यत्वादिगुणको धर्मोक्तेः" इत्यादिसूत्रैः परमेश्वरस्य धर्मोऽस्ति नान्यस्येत्यर्थप्रतिपादनम् | ८७ |
| "द्युभ्वाद्यायतनं स्वशब्दात्" इत्यादिसूत्राणां परं ब्रह्मैव द्युभ्वाद्यायतनं नान्यदित्यर्थप्रतिपादनम् | ९२ |
| "भूमा संप्रसादादध्युपदेशात्" इत्यादिसूत्राणां परमेश्वर एव भूमाशब्दवाच्यः नान्य इत्यर्थप्रतिपादनम् | ९३ |
| "अक्षरमंबरांतधृतेः" इत्यादिसूत्राणां परब्रह्मैव अक्षरशब्दवाच्यं तदेव लिंगं। ॐ तद्ब्रह्मेत्यादिवाक्यैर्ब्रह्मरूपिलिंगधारणं निश्चितमित्यर्थप्रतिपादनम् ... ... ... | ९४ |
| "ईक्षतिकर्मव्यपदेशात्सः" इत्यादिसूत्राणां शिवोपासना हृदयाकाशे कर्तव्या। हृदयकमलमध्ये ब्रह्मस्वरूपिलिंगधारणं कर्तव्यं। यस्य हृदये लिंगमस्ति स लिंगांगैक्यं प्राप्य शिवो भवति। तस्मादक्षरं प्रणवं ब्रह्म पूज्यं ध्येयं चेत्यर्थनिरूपणम् ... ... ... | ९५ |
| "दहर उत्तरेभ्यः" अस्य सूत्रस्य परमेश्वरः उपास्यः इत्यर्थनिरूपणम् ... ... | ९६ |
| "गतिशब्दाभ्यां तथाहि दृष्टं लिंगं च" इत्यादिसूत्राणां हृत्पुंडरीके शिवः उपास्यः संध्यावं- | |

| विषयः | पत्रम् |
|---|---|
| दनवद्दहराकाशे यावज्जीवं लिंगधारणं कर्तव्यमित्यर्थप्रतिपादनम् ... ... | ९६ |
| "धृतेश्च महिम्नोऽस्यास्मिन्नुपलब्धेः" इत्यादिसूत्राणां हृदये ब्रह्मरूपिलिंगं धृत्वा ध्येयमित्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... ... | ९७ |
| "उत्तराच्चेदाविर्भूतस्वरूपस्तु" इत्यादिसूत्राणां श्रुतिसूत्रन्यायभंग्या लिंगधारणं निश्चितमित्याद्यर्थप्रतिपादनम् .. ... ... ... ... ... ... | ९७ |
| "शब्दादेव प्रमितः" "हृद्यपेक्षया तु मनुष्याधिकारत्वात्" "तदुपर्यपि बादरायणः संभवात्" इत्यादिसूत्राणां जन्मकर्मनिवृत्तये विष्ण्वादिपूजितं लिंगं मनुष्यैर्देवैश्च धर्तव्यं ध्येयं चेत्यर्थप्रतिपादनम् . ... ... ... ... ... ... | ९८ |
| "विरोधः कर्मणीति चेन्नानेकप्रतिपत्तेर्दर्शनात्" इत्यादिसूत्राणां मनुष्याणां देवानां च लिंगधारणे अधिकारोऽस्ति । स्त्रीशूद्राणामधिकारोऽस्ति वा न वेत्याशंक्य समाधत्ते इत्यर्थनिरूपणम् | ९९ |
| "भावं तु बादरायणोऽस्ति हि" इत्यादिसूत्राणां संस्कारयुक्तास्सर्वेऽपि लिंगधारणेऽधिकारिणः इत्याद्यर्थप्रतिपादनम् ... ... ... ... ... ... | १०१ |
| "संस्कारपरामर्शात् तदभावाभिलापाच्च" इत्यादिसूत्राणां संस्काराभावाल्लिंगधारणे शूद्राणां नाधिकारः। सनातनं ब्रह्म लिंगं हृदंबुजे मुमुक्षुभिर्धार्यं पूज्यं चेत्यर्थनिरूपणम् ... | १०३ |
| लिंगस्वरूपनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | १०४ |
| वेदांतेषु प्रकाशितं लिंगमहत्त्वं ज्ञात्वा यो लिंगं धत्ते स परमेश्वरो भवतीत्याद्यर्थनिरूपणम्.. | १०७ |
| "आनुमानिकमप्येकेषामिति चेन्न शारीररूपकविन्यस्तगृहीतेर्दर्शयति च" इत्यादिसूत्राणां उक्तब्रह्मलक्षणं प्रधानेऽपि गतमित्याशंक्य तन्निराकरणमित्याद्यर्थनिरूपणम्... ... | १०८ |
| "तदधीनत्वादर्थवत्" इत्यादिसूत्राणां प्रधानमव्यक्तं नेत्यर्थप्रतिपादनम् ... ... | १०९ |
| "वाक्यान्वयात्" इत्यादिसूत्राणां परंब्रह्म यल्लिंगं हृदये उपास्यं मनीषिभिर्वेदितव्यं चेत्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | ११२ |
| "अवस्थितेरिति काशकृत्स्नः" इत्यादिसूत्राणां जीवब्रह्मणोर्भेदाभेदाभ्युपगमात् उपासको जीवः उपास्यं ब्रह्म लिंगांगसामरस्येन च तयोर्भेदाभेदावस्थितिरित्याद्यर्थनिरूपणम्... ... | ११४ |
| "एतेन सर्वे व्याख्याता व्याख्याताः" अस्य सूत्रस्य श्रुतिलिंगवाक्यप्रमाणादिभिः सर्वेषां वाक्यानां ब्रह्मपरतया अर्थं कृत्वा मुमुक्षुभिर्हृदये ब्रह्मरूपं लिंगं धार्यं पूज्यं चेत्याद्यर्थनिरूपणं | ११५ |
| लिंगधारणपूजाफलकथनम् ... ... ... ... ... ... | ११६ |
| वीरशैवागमव्याससूत्राणामेकार्थत्वसमर्थनम् ... ... ... ... ... | ११७ |
| जीवब्रह्मस्वरूपैक्यनिरूपणं तयोर्भेदाभेदादिनिरूपणं च ... ... ... ... | ११७ |


## द्वितीयोपदेशे ।


| | |
|---|---|
| प्रपंचस्य निमित्ते ब्रह्मणि सर्ववेदांतवाक्यानां समन्वये कृते सति तस्य स्मृत्यादिविरोधेन बाधपरिहारप्रदर्शनम्... ... ... ... ... ... ... | १२३ |
| कर्मकांडात् ज्ञानकांडस्य मुख्यत्वनिरूपणम् ... ... ... ... ... | १२३ |

| विषयः | पत्रम् |
|---|---|
| लिंगांगैक्यसमन्वये प्रदर्शिते तस्य स्मृतिविरोधे आगते सति तन्निवारणार्थं "स्मृत्यनवकाशदोषप्रसंग इति चेन्नान्यस्मृत्यनवकाशदोषप्रसंगात्" एतत्सूत्रार्थविचारेण तद्दोषपरिहरणप्रदर्शनम्. ... ... ... ... ... ... ... | १२४ |
| "इतरेषांचानुपलब्धेः" इत्यादिसूत्राणां कणादप्रमुखाः नानारीत्या शाश्वतब्रह्मस्वरूपं ज्ञात्वा तस्य नानानामानि प्रयच्छंतीत्याद्यर्थनिरूपणम् ... ... ... ... | १२५ |
| "एतेन योगःप्रत्युक्तः" अस्य सूत्रस्य लिंगांगरूपजीवात्मपरमात्मनोः लिंगांगसामरस्यप्रतिपादनं हृत्कमले मुमुक्षुभिर्ब्रह्मरूपलिंगं धार्यं तद्ब्रह्मैव जगत्कारणं प्रधानं नेत्याद्यर्थनिरूपणम् ... | १२८ |
| "सर्वधर्मोपपत्तेश्च" अस्य सूत्रस्य ब्रह्मणः साक्षित्वं प्रदर्श्य तद्ब्रह्म शक्तिविशिष्टं सर्वजगत्कारणमित्याद्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... ... | १३५ |
| "रचनानुपपत्तेश्च नानुमानं प्रवृत्तेश्च" इत्यादिसूत्राणां ब्रह्मकारणतावादे सांख्यादिभिर्यद्दूषणमुक्तं तत्सांख्यादिमतं निराक्रियते इत्याद्यर्थनिरूपणम् ... ... ... | १३७ |
| "महद्दीर्घवद्वा ह्रस्वपरिमंडलाभ्यां" इत्यादिसूत्रैः प्रधानकारणवादनिराकरणं कृतं। अधुना परमाणुकारणवादो निराक्रियते इत्याद्यर्थनिरूपणम् ... ... ... ... | १४२ |
| "समुदाय उभयहेतुकेऽपि तदप्राप्तिः" इत्यादिसूत्राणां बौद्धमतं निरस्यते इत्याद्यर्थनिरूपणम् | १४७ |
| "उत्तरोत्पादे च पूर्वनिरोधात्" इत्यादिसूत्राणां क्षणवादिमतखंडनरूपार्थप्रतिपादनम् ... | १५० |
| "प्रतिसंख्याऽप्रतिसंख्यानिरोधाप्राप्तिरविच्छेदात् इत्यादिसूत्रैः वैनाशिकमतखंडननिरूपणम्... | १५१ |
| क्षपणकमतखंडननिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | १५८ |
| "एवं चात्मा कार्त्स्न्यं" इत्यादिसूत्रैः आर्हतमतखंडननिरूपणम् ... ... ... | १६१ |
| "पत्युरसामंजस्यात्" इत्यादिसूत्रैः ईश्वरकारणवादमतखंडननिरूपणम् ... ... | १६१ |
| "उत्पत्त्यसंभवात्" इत्यादिसूत्रैः पांचरात्रमतनिरसनं मुमुक्षुभिर्हृदये लिंगं धार्यमित्याद्यर्थनिरूपणम् ... ... ... ... ... ... ... | १६३ |
| "न वियदश्रुतेः" इत्यादिसूत्राणां आकाशोत्पत्तिर्नास्तीत्यर्थनिरूपणम् ... ... | १६६ |
| "एतेन मातरिश्वा व्याख्यातः" इत्यादिसूत्राणां वायूत्पत्तिर्नास्तीत्यर्थनिरूपणम्... ... | १६७ |
| "तेजोऽतस्तथा ह्याह" "आपः" "पृथिवी" इत्यादिसूत्रैः परब्रह्मणः पंचभूतोत्पत्तिनिरूपणम् | १६८ |
| "तदभिध्यानादेव तु तल्लिंगात्सः" इत्यादिसूत्रैः जगतां ईश्वर एव हेतुरित्यर्थनिरूपणम् ... | १६८ |
| "विपर्ययेण तु क्रमोऽत उपपद्यते च" इत्यादिसूत्रैः भूतानामुत्पत्तिनिरूपणम्... ... | १६९ |
| "ज्ञोऽत एव" इत्यादिसूत्रैः आत्मनो विज्ञानस्वरूपत्वनिरूपणम् ... ... ... | १७१ |
| "उत्क्रांतिगत्यागतीनाम्" इत्यादिसूत्रैः जीवस्य अणुत्वज्ञातृत्वरूपनिरूपणम् ... | १७१ |
| "कर्ता शास्त्रार्थवत्वात्" इत्यादिसूत्रैः जीवात्मनः कर्तृत्वनिरूपणम् ... ... | १७५ |
| "अंशो नानाव्यपदेशादन्यथा चापि दाशकितवादित्वमधीयत एके" इत्यादिसूत्राणां जीवः ईश्वरांश इति निरूपणम् जीवेशयोः सामान्याभेद इत्याद्यर्थनिरूपणं च ... ... | १७६ |
| "तथा प्राणाः" इत्यादिसूत्राणां प्राणोत्पत्तिर्गौणीत्यर्थनिरूपणम् ... ... ... | १८२ |

| विषयः | पत्रम् |
|---|---|
| " अणुश्च " इत्यादिसूत्राणां मुख्यप्राणो अणुरित्यर्थनिरूपणम् ... ... ... | १८२ |
| " तस्य च नित्यत्वात् " इत्यादिसूत्राणां प्राणानां जीवेन नित्यसंबंध इत्यर्थनिरूपणम् ... | १८३ |
| " तदिंद्रियाणि तद्व्यपदेशादन्यत्र श्रेष्ठात् " इत्यादिसूत्राणां प्राणाद्वागादींद्रियतत्वांतरोत्पत्ति-निरूपणम् ... ... ... ... ... ... ... | १८३ |
| ब्रह्मसंज्ञितलिंगं हृदयकमले धार्यमित्यर्थनिरूपणम् ... ... ... ... | १८४ |




# शुद्धाशुद्धपत्रिका.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | २६ | नीला भिन्ने | नीलाभिन्ने |
| २ | १४ | सार | सौर |
| २ | ३३ | इत्यादा | इत्यादौ |
| ११ | २४ | दिष्ठानि | दिष्टानि |
| १२ | १५ | मुमुक्षा | मुमुक्षु |
| १२ | ३२ | पारब्ध | प्रारब्ध |
| १५ | २ | धृवमिम् | ध्रुवमिदम् |
| २२ | ३० | यद्यक्ष | यद्यक्षर |
| ३५ | २२ | पतिकर्मस्य | पतिधर्मस्य |
| ३६ | २९ | शव्दार्थस्य | शब्दार्थस्य |
| ५५ | ३१ | छांदोग्योपनिपदि | छांदोग्योपनिषदि |
| ५७ | १ | जन्माद्यस्ययत-इति | शास्त्रयोनित्वादिति |
| ५९ | १२ | अभूयः | भूयः |
| ६२ | २० | उमक्रमादि | उपक्रमादि |
| ६९ | ३१ | तैत्तिरीयोषनि. | तैत्तिरीयोपनि. |
| ८२ | २७ | तथोपास्यो | तथोपास्यो |
| ८८ | १३ | स्थितोऽय | स्थितो य |
| ९० | ७ | सूर्यश्चक्षर्दिशः | सूर्यश्चक्षुर्दिशः |
| ९० | १९ | यत्पुरुपः | यत्पुरुषः |
| ९३ | १२ | संन्निधाय | सन्निधाय |

| पान. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९७ | १ | उप | धृतेश्च महिम्नोऽस्यास्मिन्नुप |
| १०३ | ३२ | गौतमधर्मे १०--५ | गौतमधर्मे अ. १० सू. ५१ |
| १०३ | २५ | उच्चारणे जिव्हाच्छेदः धारणे शरीरच्छेदः | उदाहरणे जिव्हाच्छेदो धारणे शरीरभेदः |
| १०३ | ३३ | गौतमधर्मे १२--६ | गौतमधर्मे अ. १२ सू. ४ |
| ११० | १४ | मिहेष्वते | मिहेष्यते |
| ११३ | २७ | आकाशस्तस्मित् | आकाशस्तस्मिन् |
| ११५ | ३ | क्रर्तृ | कर्तृ |
| १२० | १३ | मर्वात्मत्वं | सर्वात्मत्वं |
| १२० | २० | भदाभेदौ | भेदाभेदौ |
| १२४ | १ | प्रथमोपदेशे | द्वितीयोपदेशे |
| १२८ | १ | प्रथमोपदेशे | द्वितीयोपदेशे |
| १३० | ३ | " स्वपक्षहोषाञ्च " | " स्वपक्षदोषाञ्च " |
| १३८ | २७ | स्ययमेव | स्वयमेव |
| १४२ | १६ | ग़ुणानारंभंत | गुणानारभंत |
| १४८ | ५ | अन्यम्य | अन्यस्य |
| १४९ | ९ | संघातस्य | संघातस्य |
| १५५ | २३ | म्वप्नप्रत्यय | स्वप्नप्रत्यय |
| १५७ | ३० | विनाष्यर्थेन | विनाप्यर्थेन |
| १५८ | ९ | क्षकिकत्वा | क्षणिकत्वा |
| १५९ | २४ | अन्यस्त्वलांकाकाशः | अन्यस्त्वलोकाकाशः |
| १६२ | २८ | पाशेः | पाशो |
| १६३ | ९ | वैलक्ष्यण्यात् | वैलक्षण्यात् |
| १६८ | १३ | श्रुतेगौणत्वं | श्रुतेर्गौणत्वं |
| १६८ | १६ | अगिरुत्पद्यते | अग्निरुत्पद्यते |
| १७८ | १९ | ईशरांशत्वं | ईश्वरांशत्वं |
| १८० | २४ | व्यपदशेः | व्यपदेशः |
| १८१ | ८ | अतसएव | अतःस एव |
| १८२ | ९ | श्रुत्तिश्च | श्रुतिश्च |
| १८२ | २२ | खलुः | खलु |
| १८३ | २५ | रूपाया मांसाद्याध्यात्म- | रूपायामासाद्याध्यात्म |

ॐ

श्रीमते रेणुकाचार्याय नमः

# क्रियासारांतील उपोद्धातप्रकरणाचा सारांश.

(१) पहिल्यापासून शेवटपर्यंत मंगलस्वरूपानें असणारें, असामान्य, विश्वाची उत्पत्ति व लय यांस कारण, जराव्याधिरहित, आत्मदेही, पंचमुखी (पांच तोंडांचें) प्रचंड पांच कृत्यें ( सृष्टि, स्थिति, संहार, नियमन, अनुप्रवेश ) करणारें, जें उमामहेश्वरसंबंधी तेज त्याचें मी मनांत ध्यान करितों. (२) कैलासपर्वतावर राहणारा, चंद्राची कला भूषण समजून आनंदानें मस्तकावर धारण करणारा, डाव्या बाजूस असलेल्या सुंदर पार्वतीमुळें अर्धनारी झालेला; कस्तुरीच्या व चकचकीत कापराच्या उटीनें शोभायमान देहाचा, व असंख्य सेवकांनीं शोभणारा जो शंकर त्यास माझा नमस्कार असो. (३) रुद्राक्षांच्या माळांनीं शोभणारे, पांढरेसफेत, विपुल व मङ्गलदायक भस्म अंगास लावलेले, अट्टहासानें मान्य झालेले; ब्रह्मचिंतनांत आनंद मानणारे; शंकराच्या प्रसादानें अणिमा, गरिमा, लघिमा इत्यादि आठ सिद्धि मिळविलेले; वज्रानें ज्याप्रमाणें डोंगराचे चूर करावेत त्याप्रमाचें विघ्नांचा नाश करण्यांत पटाइत असलेले जे शंकराचे सेवक त्यांस मी नमन करितों. (४) सनातन वीर-शैवांच्या दिव्य-आगमांत सांगितलेल्या योग्य प्रकारांनीं सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं शिवपूजा करण्यांत जो कधींहि निरुत्साही दिसला नाहीं व असें करूनहि शिवचरणीं असलेलें आपलें अकृत्रिम प्रेम दाखविण्यास दिवसरात्र हीं ज्यास पुरेशीं झालीं नाहींत त्या माझ्या गुरुवर्य मल्लयदेव नामक बापाचें मी वन्दन करितों. (५) नेहमीं अत्यंत भक्तिरसानें शिवपूजेच्या वेळीं परिचारक ( सेवक ) होऊन नवऱ्याचें चांगलें प्रेम संपादन करणारी, परशिवाचे चरणीं प्रेम ठेवणारी आपल्या दर्शनानें दुसऱ्यास पवित्र करणारी, दुसऱ्यानें दिलेलें दुःख सहन करूनहि उलट त्याचें कल्याण करणाऱ्या पृथ्वीच्या स्वभावाचें अनुकरण करणारी व मला जन्म देणारी जी माझी चन्नमांवा नांवाची आई तिचें मी प्रेमानें वंदन करितों (६) कैलास पर्वताचा स्वामी, चंद्रकला मस्त-कावर धारण करणारा व करुणासागर अशा शंकरानें पाहाटेस ( स्वप्नांत ) दर्शन देऊन मधुर व अस्खलित वाणीनें मला अशी आज्ञा केली कीं, "बालका सर्व आगमांतून सारभूत वचनें घेऊन क्रियासार नांवाचा ग्रन्थ तूं तयार करावा ह्याकामीं तुझी बुद्धि विस्तार पावेल" (७) ह्याप्रमाणें त्याच्याकडून आज्ञा पावून स्वरसानें विकसित झालेली सूक्ष्म बुद्धि मिळवून ह्या जगीं सज्जनांची विशेष प्रीति संपादन करण्यासाठीं परशिवाच्या वचनभूत अशा सर्व आगमांचा संग्रह करून स्वप्नांत उपदेश मिळालेल्या शिवमंत्राचें वरचे वर अनुकलन करीत मी नीलकंठ हा क्रियासार नांवाचा चांगला ग्रन्थ रचितों. (८) एकदां मनुष्य लिंगांगी झाला ह्मणजे तो पुनः मनुष्यकोटींत गणिला जात नाहीं. जरी तो मनुष्यदेही झाला तरी तो, हातांत हरिण घेतलेला, मन्मथ विकाररहित, अंगावर सर्पभूषणें धारण करणारा शंकरच होईल तात्पर्य हेंच कीं, लिंगधारी मनुष्य जरी देहधारी झाला तरी तो शंकर आहे असें मानावें. (९) श्रीशिवाच्या मुखांतून निघालेले निगम व आगम ह्यांना अनुसरून

